सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता महत्वांच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१९/प्र.क्र.८७/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२०

**वाचा:-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/ यो/नबाप्र/ प्र.क्र.२१ (SFD) ५०७/२०१९-२०, दि. ०२.०७.२०१९ चे पत्र.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक साववि-२०१९/ प्र.क्र.८७/ फ-११, दि. २४.०७.२०१९

**प्रस्तावना:-**

वने व वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०१९-२० करीता “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण (४४०६ ०४९२ )" या योजनेंतर्गत रु.९४८७५.०० लक्ष इतका निधी (०२ मजूरी-रु.७५९००.०० लक्ष + २१ पुरवठा व सामुग्री-रु.१८९.७५ लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधी खालील नमूद योजनांमध्ये खालीलप्रमाणे विभागण्यात आला आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र | सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण (४४०६०४९२) | सन २०१९-२० करिता अर्थ-संकल्पित रक्कम | पुरवणी मागणीद्वारे मंजूर रक्कम (जुलै२०१९) | एकूण निधी |
|---|---|---|---|---|
| १ | वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ४३५००.०० | २००००.०० | ६३५००.०० |
| २ | महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण | ३७५.०० | -- | ३७५.०० |
| ३ | महत्वाचे रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे दुतर्फा वृक्षलागवड | ५१०००.०० | २१६९२.०० | ७२६९२.०० |
| | **एकूण** | **९४८७५.००** | **४१६९२.००** | **१३६५६७.००** |

३. महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण या योजनेसाठी ३७५.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित असून वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ च्या परिपत्रकास अनुसरुन अर्थसंकल्पित रकमेच्या ६०% रु.२२५.०० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यापैकी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये रु. ११२.५० लक्ष निधी वितरित करण्यात आला आहे व रु. ११२.५० लक्ष वितरणासाठी शिल्लक आहे.

४. सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील उर्वरित कमी कालावधी लक्षात घेता महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरणासाठी वितरणासाठी उपलब्ध असलेला निधी रु. ११२.५० लक्ष वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात **(००) (०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६०४९२)** या योजनेंतर्गत **महत्वांच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण या योजनेसाठी** रु.११२.५० लक्ष **(०२- मजूरी रु. ९०.०० लक्ष व २१ -पुरवठा सामग्री रु.२२.५० लक्ष) इतका** निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. संदर्भ क्र. ३ अन्वये वितरित करण्यात आलेला सर्व निधी खर्च झाल्याची खात्री केल्यानंतर व उपयोगिता प्रमाणपत्र घेतल्यांनतरच हा निधी वितरित करण्यात यावा.

४. वितरित करुन घेतलेला निधी मंडळे/ महामंडळ यांच्या वा इतर बँक खात्यात, स्वयंप्रपची लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभगाकडील ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार नाही.

५. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र.सी-१०,
४४०६ वनीकरण व वन्यजीवनयावरील भांडवली खर्च,
(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन,
महत्वांच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण (४४०६०४९२).
०२- मजूरी व २१- पुरवठा व सामग्री

८. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१२१२२२५५०११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DAMODHAR SITARAM DALVI

Digitally signed by DAMODHAR SITARAM DALVI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=ef72079fa46879c38e604681191069c57000e73e78700748258ef7a9095f84d9, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=f62a7252ed770981b2324209adc4d21c5f260d6817740e3a114e91e153b61422, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DAMODHAR SITARAM DALVI
Date: 2020.02.12 12:24:37 +05'30'

**( दामोधर दळवी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५.निवडनस्ती/फ-११.